**राज्यातील अल्पसंख्याक बहुल भागातील**
**विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत**
**दुसरी/ तिसरी पाळी सुरू करण्यासाठी**
**अनुदान उपलब्ध करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्यांक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक :औप्रस-२०११/प्र.क्र.७६/का.८
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २१ जून, २०११.

वाचा :- १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक :आयटीआय-२००९/ (११/०९)/व्यशि-३, दि. २९/८/२००९.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक :आयटीआय-२००९/ (११/०९)/व्यशि-३, दि. २१/८/२०१०.
३) शासन परिपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक बीयुडी-२०११/ प्र.क्र.६४/का.७, दि.२१.५.२०११.

**शासन निर्णय :-**

राज्यातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी ४३ अल्पसंख्याक बहुल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये दुस-या/तिस-या पाळीत २४८ तुकडया त्याचप्रमाणे बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरु होणा-या २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये २८ तुकडया सुरू करण्यासाठी दि.२९.८.२००९ व दि. २१.८.२०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (१६) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए ५३४)" या लेखाशीर्षाखाली सन २०११-१२ या वर्षाकरिता ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली रु. ८,००,००,०००/- (रुपये आठ कोटी फक्त) व ३६ सहायक अनुदान (वेतन) या उद्दीष्टाखाली रू.१०,००,००,०००/- (रूपये दहा कोटी फक्त) एवढया रक्कमेची तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीपैकी ७५ टक्के तरतूद अनुक्रमे रू.६,००,००,०००/- (रू. सहा कोटी फक्त) व रू.७,५०,००,०००/- (रू. सात कोटी पन्नास लाख फक्त) अशी एकूण रू. १३,५०,००,०००/- (रू. तेरा कोटी पन्नास लाख फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देत आहे. सदर योजनेवरील खर्च याव्दारे मंजूर केलेल्या एकूण वार्षिक तरतूदीच्या ७५ टक्के अनुदानाच्या मर्यादेत ठेवण्यात यावा.

३. सदर तरतूद संचालक, प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (१६) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए ५३४) या लेखाशीर्षाखाली सन २०११-१२ साठी अनुदानाचे वाटप

(रू. हजारात)

| तपशीलवार लेखाशीर्ष | सन २०११-१२ साठी अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान | वितरीत करावयाचे अनुदान रू. हजारात | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | मे, २०११ | जून, २०११ | जुलै, २०११ | ऑगस्ट २०११ | सप्टेंबर २०११ | ऑक्टोबर २०११ | नोव्हेंबर २०११ | डिसेंबर २०११ |
| (२२३५ ए ५३४) ३१ सहाय्यक अनुदान(वेतनेत्तर) | ८०,००० | ० | १०,००० | १०,००० | १०,००० | १०,००० | १०,००० | ५,००० | ५,००० |
| (२२३५ ए ५३४) ३६ सहाय्यक अनुदान (वेतन) | १००,००० | ५,००० | १०,००० | १०,००० | १०,००० | १०,००० | १०,००० | १०,००० | १०,००० |

४. या योजनेअतंर्गत अल्पसंख्याक समाजातील विदयार्थ्यांना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा. तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विहित मुदतीत शासनास सादर करावे.

५. हा शासन निर्णय, नियोजन व वित्त विभागाने त्यांचेअनौपचारिक संदर्भ अनुक्रमे क्र. ९३/१४७५ दि.१०.६.११ व क्र.४१७/११/व्यय४, दि. १८/०६/२०११अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०६२११६५६१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(आ. श. शेंडगे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ,
प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था (सर्व), महाराष्ट्र राज्य
महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालक (प्रशिक्षण) यांचे मार्फत)
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
नियोजन विभाग का. १४७५,
वित्त विभाग, व्यय-४/ अर्थ-३ व १४,
अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती.